**खरीप पणन हंगाम २०१२-१३ व २०१३-१४ मधील खरेदी करण्यात आलेल्या तथापि भरडाईविना शिल्लक धानाची जाहिर ई-लिलाव प्रक्रियेद्वारे विक्री करणेबाबत .**

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः : खरेदी - २०१५ /प्र.क्र.१/ ना.पु.२९**
**मंत्रालय विस्तार,मुंबई- ४०० ०३२.**
**तारीख: - १६ मार्च, २०१५**

**वाचा :**

केंद्र शासनाच्या उपभोक्ता मामले, खाद्य एवं सार्वजनिक वितरण मंत्रालय, खाद्य एवं सार्वजनिक वितरण विभाग, नवी दिल्ली यांचे पत्र क्रमांक ५(४)/२०१४/पीवाय-१, दिनांक १३ नोव्हेंबर, २०१४

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाच्या किमान आधारभूत किंमत खरेदी योजनेअंतर्गत खरीप पणन हंगाम २०१३-१४ मध्ये मार्केटिंग फेडरेशन आणि आदिवासी विकास महामंडळ या दोन अभिकर्ता संस्थामार्फत धानाची खरेदी पुढीलप्रमाणे झालेली आहे.

| अ.क्र. | अभिकर्ता संस्था | धान ( क्विंटलमध्ये) |
|---|---|---|
| १ | मार्केटिंग फेडरेशन | १३,९२,४७४.५७ |
| २ | आदिवासी विकास महामंडळ | १०,०६,५५८.०८ |
| | एकूण | २३,९९,०३२.६५ |

२. केंद्र शासनाने खरीप पणन हंगाम २०१३-१४ करीता धान भरडाईची वाढीव मुदत दिनांक३१.१२.२०१४ अखेरपर्यंत दिली होती. त्यानंतर आणखी मुदतवाढ मिळणार नाही, असे त्यांच्या दिनांक १३.११.२०१४ च्या पत्रान्वये राज्य शासनास कळविले होते. केंद्र शासनाने धान भरडाईसाठी दिलेली वाढीव मूदत संपुष्टात आली असल्याने भरडाईविना शिल्लक असलेल्या धानाची विल्हेवाट लावण्याची जबाबदारी आता राज्य शासनाची आहे.

३. खरीप पणन हंगाम २०१३-१४ मधील कोकण/ नागपूर महसूली विभागातील ज्या जिल्हयात भरडाईविना धान शिल्लक राहिलेला आहे, तेथील धान खरेदी / भरडाई तसेच भरडाईविना शिल्लक असलेल्या धानाचा तपशिल पुढीलप्रमाणे आहे:-

| जिल्हा | एकूण धान खरेदी (क्विंटलमध्ये) | धानाची झालेली भरडाई ( क्विंटलमध्ये) | भरडाईविना शिल्लक धान (क्विंटलमध्ये) | भरडाईची टक्केवारी |
|---|---|---|---|---|
| ठाणे | १,४६,१५२.९७ | ६०,४५६.९० | ८५,६९६.०७ | ४१.३७ |

| जिल्हा | एकूण धान खरेदी (क्विंटलमध्ये) | धानाची झालेली भरडाई ( क्विंटलमध्ये) | भरडाईविना शिल्लक धान (क्विंटलमध्ये) | भरडाईची टक्केवारी |
|---|---|---|---|---|
| रायगड | ८७,११०.१३ | १०००.०० | ८६,११०.१३ | १.१५ |
| रत्नागिरी | २४,४९८.४६ | ०.०० | २४,४९८.४६ | ०.०० |
| सिंधुदूर्ग | २३,९९८.५४ | ०.०० | २३,९९८.५४ | ०.०० |
| कोल्हापूर | १,०२२.६६ | ५००.०० | ५२२.६६ | ४८.८९ |
| गडचिरोली | ५,७७,४०२.२५ | ५,२१,३४७.१३ | ५६,०५५.१२ | ९०.२९ |
| गोंदिया | ३,२३,०१४.३२ | २,७८,१५६.८७ | ४४,८५७.४५ | ८६.११ |
| एकूण | **११,८३,१९९.३३** | **८,६१,४६०.९०** | **३,२१,७३८.४३** | **७२.८०** |

४. उपरोक्त धान केंद्रीय साठयामधून वगळला गेला असल्याने या धानाची विल्हेवाट / विक्री करण्याची जबाबदारी आता राज्य शासनाची आहे. यापूर्वीही राज्य शासनाने किमान आधारभूत किंमत खरेदी योजनेंतर्गत खरीप पणन हंगाम २००९-१०,२०१०-११ व २०११-१२ मधील भरडाईविना शिल्लक असलेला व केंद्रीय साठयामधून वगळलेला सुमारे ११.८४ लक्ष क्विंटल धान ई-लिलावाद्वारे विक्री केलेला आहे. त्याशिवाय, खरीप पणन हंगाम २०१३-१४ मधील खरेदी करण्यात आलेला सुमारे ९.५५ लक्ष क्विंटल मका ई- लिलावाद्वारे नुकताच यशस्वीरित्या विक्री केलेला आहे.

५. वरील कार्यवाहीच्या धर्तीवर आता खरीप पणन हंगाम २०१३-१४ मधील कोकण/ नागपूर महसूली विभागातील भरडाईविना शिल्लक असलेला सुमारे ३.२२ लक्ष क्विंटल धान ई-लिलावाद्वारे विक्री करणे क्रमप्राप्त आहे. सदरहू धान दीर्घ कालावधीसाठी गोदामामध्ये साठवून राहिल्यास त्यात नैसर्गिकरित्या तूट ( Driage) येण्याची शक्यता असते. शिवाय हे धान साठविण्यासाठी वाढीव गोदाम भाडयाचा भुर्दंडदेखील राज्य शासनावर पडण्याची शक्यता आहे. त्यामुळे या धानाची विक्री प्रक्रिया लवकरात लवकर पुर्ण करणे आवश्यक आहे. त्यामुळे सदरहू धान ई - लिलावाद्वारे विक्री करण्यात यावा.

६. या अनुषंगाने सबंधित जिल्हा पुरवठा अधिकारी व उपायुक्त ( पुरवठा ), कोकण विभाग , नवी मुंबई व अन्य अधिकारी यांचेसमवेत मा. सचिव ( अनापुवग्रासं) यांच्या अध्यक्षतेखाली दिनांक ३.०१.२०१५ रोजी दुपारी १२.३० वाजता बैठक आयोजित करण्यात आली होती. सदर बैठकीत झालेल्या तपशिलवार चर्चेअंती भरडाईविना शिल्लक असलेला हा धान ई- लिलावाद्वारे विक्री करण्याबाबतचा निर्णय घेण्यात आला. सदर बैठकीचे वेळी भारतीय अन्न महामंडळाच्या वरिष्ठ अधिका-यांशी मा. सचिव, (अनापुवग्रासं ) यांनी दुरध्वनीद्वारे संपर्क साधला असता, सदरहू भरडाईविना शिल्लक असलेला धान आता केंद्रीय साठयामधुन वगळला गेला असून त्याची जबाबदारी/ मालकी आता राज्य शासनाची असल्याने आता या धानाची विल्हेवाट / विक्री करण्यासाठी केंद्र शासनाची वेगळी मान्यता आवश्यक नाही, असे स्पष्ट करण्यात आले.

७. याचवेळेस आदिवासी विकास महामंडळाने त्यांच्या दिनांक १०.१२.२०१४ च्या पत्रान्वये आधारभूत किंमत खरेदी योजनेंतर्गत खरीप पणन हंगाम-२०१२-१३ मधील गडचिरोली व ठाणे जिल्हयातील भरडाईविना शिल्लक असलेला धान देखील विक्री करण्यात यावा असे कळविले आहे.

| जिल्हा | एकूण धान खरेदी (क्विंटलमध्ये) | धानाची झालेली भरडाई (क्विंटलमध्ये) | भरडाईविना शिल्लक धान (क्विंटलमध्ये) |
|---|---|---|---|
| ठाणे | ५२,९८०.१८ | ४६,०२४.९४ | ६,९५५.२४ |
| गडचिरोली | २,१५,७९२.२९ | १,९१,९३६.०५ | २३,८५६.२४ |
| **एकूण** | **२,६८,७७२.४७** | **२,३७,९६०.९९** | **३०,८११.४८** |

आदिवासी विकास महामंडळाने कळविलेली उपरोक्त परिच्छेदामधील वस्तुस्थिती विचारात घेता, हा धान देखील केंद्रीय साठयामधून वगळला गेला असल्याने त्याची विल्हेवाट/ विक्री करण्याची जबाबदारी आता राज्य शासनाची आहे.

८. यास्तव, खरीप पणन हंगाम २०१२-१३ व २०१३-१४ मधील खरेदी करण्यात आलेल्या व भरडाईविना शिल्लक असलेल्या धानाची जाहिर ई-लिलावाद्वारे विक्री करून विल्हेवाट लावण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्या अनुषंगाने शासनाने आता पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे

## शासन निर्णयः-

खरीप पणन हंगाम २०१२-१३ व २०१३-१४ मध्ये खरेदी करण्यात आलेल्या व भरडाईविना शिल्लक असलेल्या धानाची जाहिर ई-लिलावाद्वारे विक्रीची संपूर्ण प्रक्रिया " जेथे आहे व जसे आहे" या तत्वावर करण्यासाठी संबंधित जिल्हयाच्या जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली पुढीलप्रमाणे समिती स्थापन करण्यात येत आहे.

| अ.क्र. | पदनाम | |
|---|---|---|
| १. | संबधित जिल्हयांचे जिल्हाधिकारी<br>(पालघर, ठाणे,रायगड, रत्नागिरी, सिंधुदुर्ग, कोल्हापूर,गडचिरोली व गोंदिया) | अध्यक्ष |
| २. | संबधित जिल्हयांचे जिल्हा पुरवठा अधिकारी,<br>(पालघर, ठाणे,रायगड, रत्नागिरी, सिंधुदुर्ग, कोल्हापूर,गडचिरोली व गोंदिया) | सदस्य - सचिव |
| ३. | संबधित जिल्हयांचे जिल्हा मार्केटिंग अधिकारी<br>(पालघर, ठाणे,रायगड, रत्नागिरी,सिंधुदुर्ग व कोल्हापूर ) | सदस्य |
| ४. | आदिवासी विकास महामंडळाचे संबंधित जिल्हयाचे प्रादेशिक व्यवस्थापक,<br>(ठाणे, रायगड, गडचिरोली व भंडारा) | सदस्य |

२. सदरहू समितीची कार्यकक्षा पुढीलप्रमाणे राहील.

१) सदरहू धानाची संपूर्ण विक्री प्रक्रिया जाहिर निविदाद्वारा उपरोक्त समितीद्वारा करण्यात यावी.

२) ही संपूर्ण प्रक्रिया ई-निविदा पद्धतीचा अवलंब करुन करावी. याकरीता ई-निविदेसाठी नोंदणी करणे, नोडल ऑफिसर नेमणे ई.संपूर्ण पूर्व तयारी करावी.या धान विक्रीसाठी राज्यस्तरीय मराठी व इंग्रजी वर्तमान पत्रात मोठया प्रमाणात प्रसिद्धी दयावी व निविदा भरण्यासाठी आवश्यक कालावधी किमान ७ दिवस ठेवावा.

३) धानापैकी गोदामात साठवणूक केलेला तसेच गोदामाबाहेर ठेवलेल्या साठयाच्या स्वंतत्र यादया निविदे सोबत ठेवण्यात याव्यात.

४) ई-निविदा काढताना प्रत्येक गोदाम वेगळे समजून गोदाम निहाय स्वतंत्र ई-निविदा काढण्यात यावी.

५) निश्चित केलेली अनामत रक्कम व सुरक्षा ठेव यांचा स्पष्ट उल्लेख निविदेमध्ये करावा व त्याचा डिमांड ड्राफ्ट प्राप्त करुन घ्यावा.

६) अटी/शर्तीमध्ये पात्र होणाऱ्या व जास्तीत जास्त दर देणाऱ्या खरेदीदाराचे दर अपेक्षित किंमती एवढे (Upset Price) किंवा त्यापेक्षा जास्त असल्यास त्यास समितीने मान्यता दयावी.

७) निविदा प्राप्त झाल्यानंतर ज्या निविदाकाराचे दर मंजूर होतील, त्या निविदा धारकांस समिती अध्यक्षांमार्फत निविदा स्वीकृतीबाबतचे पत्र देण्यात येईल.

८) निविदा प्रक्रियेचा तसेच विक्रीचा दैनंदिन अहवाल व प्राप्त धनाकर्ष यांची माहिती सदस्य सचिव यांनी तयार करावी.

९) इच्छूक खरेदीदारास धानाची पाहणी करावयाची असल्यास त्यांनी संबंधित जिल्हयांच्या जिल्हा पुरवठा अधिकारी यांच्याशी संपर्क साधावा.

१०) निविदाकार एका ठिकाणच्या संपूर्ण साठयाकरीता किंवा एकापेक्षा अधिक ठिकाणच्या संपूर्ण साठयाकरीता निविदा सादर करु शकतील. परंतू निविदेतील दर कोणत्याही अटीशी निगडीत असू नयेत.

११) साठा असेल तेथून धानाची उचल, वाहतूक व हमाली इत्यादीकरीता संपूर्ण खर्च खरेदीदारानेच करावयाचा आहे.

१२) खरेदीदारास धान खरेदी, साठवणूक व त्याची विल्हेवाट याबाबत राज्य /केंद्र शासन अथवा इतर शासकीय संस्थांचे आवश्यक परवाने प्राप्त करुन घ्यावे लागतील. त्याबाबतची संपूर्ण जबाबदारी खरेदीदाराची राहील. यासंदर्भात राज्य शासन कोणतीही जबाबदारी स्विकारणार नाही.

१३) धानाच्या संपूर्ण परिमाणाची संपूर्ण रक्कम साठा उचलण्यापूर्वी भरावी लागेल.

१४) ज्या खरेदीदाराचे दर मंजूर होतील तसे त्यांना लेखी कळविण्यात येईल. तसे लेखी कळविल्यापासून संबंधितांनी ७ दिवसांच्या आत सुरक्षा रक्कम भरणे आवश्यक आहे. व संपूर्ण साठा ३० दिवसांच्या आत उचलणे बंधनकारक राहील.

१५) एकदा दर सादर केल्यानंतर त्यात कोणतेही बदल अनुज्ञेय राहणार नाहीत. दर सादर करुन विहित मुदतीत सुरक्षा रक्कम न भरल्यास अनामत रक्कम जप्त करण्यात येईल.

१६) धान विक्रीची हातची राखीव किंमत निर्धारित करताना प्रत्यक्ष प्रदान केलेला देय दर, अनुषंगिक खर्च व बाजारदराचा विचार करण्यात यावा व सदर बाब गोपनिय ठेवण्यात यावी.

१७) जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखालील गठित समितीस अंतिम निर्णय घेण्याचे सर्वाधिकार प्रदान करण्यात येत आहेत.

१८) सुरक्षा ठेव व अनामत रक्कमेचा धनाकर्ष जिल्हाधिकारी यांचे नांव स्वतंत्ररित्या स्विकारण्यात यावा.

१९) प्रत्यक्ष ई- लिलावामार्फत विक्री होऊन जमा होणा-या १०० % रक्कमेचा धनाकर्ष वित्तीय सल्लागार व उपसचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक सरंक्षण विभाग, मुंबई यांच्या नावे देय असलेला स्विकारण्यात यावा.

२०) कोणतेही कारण न देता ई- निविदा अंशत:/ पुर्णत: मंजूर किंवा ना मंजूर करण्याचा अधिकारी गठित समितीस असेल.

३. उपरोक्त समितीने वरील प्रमाणे कार्यकक्षा निश्चित करुन खरीप पणन हंगाम २०१२-१३ व २०१३-१४ मधील भरडाईविना शिल्लक धानाची विक्री प्रक्रिया दिनांक १५ एप्रिल,२०१५ अखेर पर्यंत पूर्ण करावी.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३१६१५१७२२२४०६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SATISH SHRIDHAR SUPE

Digitally signed by SATISH SHRIDHAR SUPE
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=FOOD CIVIL SUPPLY AND CONSUMER PROTECTION, postalCode=400032, st=Maharashtra, cn=SATISH SHRIDHAR SUPE
Date: 2015.03.16 15:29:31 +05'30'

**( सतीश सुपे )**

**उपसचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय,मुंबई.

२. अप्पर मुख्य सचिव, (वित्त) महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई.

३. सचिव, अन्न,नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग,

४. अप्पर मुख्य सचिव, कृषि व प.दु.म. विभाग, मंत्रालय, मुंबई,
५. सचिव, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय,मुंबई,
६. सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय,मुंबई,
७. अपर मुख्य सचिव, महसूल व वन विभाग,मंत्रालय,मुंबई
८. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र स्टेट को.ऑप.मार्केटिंग फेडरेशन लि., कनमूर हाऊस,नरसी नाथा स्ट्रीट, मुंबई- ४०० ००९,
९. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ, आदिवासी विकास भवन, २ रा माळा, राम गणेश गडकरी चौक, जुना आग्रा रोड,नाशिक-२,
१०. विभागीय आयुक्त, कोकण व नागपूर विभाग
११. नियंत्रक (शिधावाटप) व संचालक नागरी पुरवठा(गो/वा),मुंबई,
१२. जिल्हाधिकारी, पालघर, ठाणे,रायगड, रत्नागिरी, सिंधुदुर्ग ,कोल्हापूर, गडचिरोली व गोंदिया.
१३. उप आयुक्त (पुरवठा), कोकण व नागपूर विभाग,नवी मुंबई / नागपूर.
१४. जिल्हा पुरवठा अधिकारी, पालघर, ठाणे,रायगड, रत्नागिरी, सिंधुदुर्ग , कोल्हापूर, गडचिरोली व गोंदिया.
१५. जिल्हा मार्केटिंग अधिकारी, पालघर, ठाणे,रायगड, रत्नागिरी, सिंधुदुर्ग , कोल्हापूर, गडचिरोली व गोंदिया.
१६. जिल्हा कोषागार अधिकारी, पालघर, ठाणे,रायगड, रत्नागिरी, सिंधुदुर्ग , कोल्हापूर, गडचिरोली व गोंदिया.
१७. प्रादेशिक व्यवस्थापक, आदिवासी विकास महामंडळ , ठाणे , रायगड, गडचिरोली व भंडारा.
१८. जिल्हा कृषि अधिकारी, पालघर, ठाणे,रायगड, रत्नागिरी, सिंधुदुर्ग , कोल्हापूर, गडचिरोली व गोंदिया.
१९. वित्तीय सल्लागार व उप सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई,
२०. उप संचालक, नागरी पुरवठा, पुरवठा आयुक्त कार्यालय, मुंबई.
२१. सर्व उप सचिव/अवर सचिव/सर्व कक्ष अधिकारी,अ.ना.पु.व ग्रा.सं.विभाग,मंत्रालय विस्तार, मुंबई,
२२. सर व्यवस्थापक (महा.) भारतीय अन्न महामंडळ, ५ वा माळा, राजेंद्र नगर, दत्तपाडा रोड, बोरीवली (पूर्व) मुंबई-६६.
२३. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई ( ५ प्रती ),
२४. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय ग्रंथालय, ६ वा मजला, विधान भवन,मुंबई. (१०प्रती)
२५. निवड नस्ती (नापु-२९).